**भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारीतील निवडणुका-संबंधित सुरक्षा कर्तव्यासाठी तैनात करण्यात येणाऱ्या केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी /कर्मचारी यांच्यासाठी मानधनाचे दर निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : सीईएल-२०२४/प्र.क्र.७०७/२४/३३,**
मादाम कामा रोड, राजगुरु हुतात्मा चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १६ जुलै, २०२४

**वाचा :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र. सीईएल-२०१७/प्र.क्र.२६२/१७/३३, दिनांक १६ नोव्हेंबर, २०१७

**प्रस्तावना :-**

भारत निवडणूक आयोगाने त्यांचे पत्र क्रमांक ४६४/INST/EPS/२०२३/Honorarium, दिनांक ०६.०६.२०२३ अन्वये भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारीतील निवडणुका-संबंधित सुरक्षा कर्तव्यासाठी तैनात करण्यात येणाऱ्या केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) (Central Armed Police Forces) अधिकारी /कर्मचारी यांच्यासाठी मानधनासंदर्भातील वेळोवेळी जारी केलेल्या सूचनांचे पुनरावलोकन, एकत्रीकरण केले आहे आणि मागील सर्व सूचना अधिक्रमित करून, आयोगाने सर्वसमावेशक सूचना जारी केल्या आहेत. त्यानुसार सदर विषयाबाबतचा या कार्यालयाचा दिनांक १६.११.२०१७ च्या संदर्भाधिन शासन निर्णय अधिक्रमित करणे आवश्यक आहे.

केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी /कर्मचाऱ्यांनी निवडणुकीच्या काळात, विविध आणि कठीण भूभागात/प्रदेशांमध्ये, बंडखोरी, वामपंथी अतिरेकी आणि दहशतवादापासून अंतर्गत कलह आणि जातीय-सांप्रदायिक संघर्षापर्यंत अनेक धोके आणि आव्हानांना सतत काही आठवड्यांपर्यंतच्या कालावधीसाठी तोंड द्यावे लागते, अशा सी.ए.पी.एफ. अधिकारी /कर्मचाऱ्यांनी बजावलेल्या कर्तव्यांचे जिकरीचे आणि संवेदनशील स्वरूप लक्षात घेऊन, केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी /कर्मचाऱ्यांनी पार पाडलेल्या निवडणूक-संबंधित सुरक्षा कर्तव्यासाठी त्यांना मानधन देण्याबाबत भारत निवडणूक आयोगाने निर्देश दिले आहेत. त्याअनुषंगाने राज्यात निवडणुकांच्या कर्तव्यार्थ नियुक्त केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी/कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या मानधनाच्या संदर्भात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय :-**

राज्यात निवडणुकांच्या कामासाठी नियुक्त केलेल्या केंद्रीय सशस्त्र सुरक्षा दल/ राज्य सशस्त्र पोलीस अधिकारी /कर्मचाऱ्यांना द्यावयाच्या मानधनाचे दर निश्चित करण्याबाबतचा दिनांक १६ नोव्हेंबर, २०१७ रोजीचा संदर्भाधिन शासन निर्णय अधिक्रमित करुन, भारत निवडणूक आयोगाच्या पत्र क्रमांक ४६४/INST/EPS/२०२३/Honorarium, दिनांक ०६.०६.२०२३ अन्वये देण्यात आलेल्या सूचनांना अनुसरुन भारत निवडणूक आयोगाच्या अखत्यारीतील निवडणुका-संबंधित सुरक्षा कर्तव्यासाठी तैनात केलेले केंद्रीय

सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी /कर्मचारी यांना पुढीलप्रमाणे मानधनाचे दर निश्चित करण्यास मंजूरी देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | लाभार्थ्यांची श्रेणी | दर |
|---|---|---|
| १ | **सी.ए.पी.एफ. चे राजपत्रित अधिकारी** (कमांडंट [Commandant], तदर्थ कमांडंट [Ad hoc Commandant], उप कमांडंट [Dy. Commandant], सहायक कमांडंट [Assistant Commandant], वैद्यकीय अधिकारी[Medical Officer] व इतर समतुल्य श्रेणीचे अधिकारी) | (१) १५ दिवस किंवा त्यापेक्षा कमी - रु.२,५००/-<br>(२) १५ दिवसापेक्षा अधिक- रु.१,२५०/- प्रती आठवडा या दरानुसार |
| २ | **सी.ए.पी.एफ. चे दुय्यम अधिकारी** (निरीक्षक [Inspector], उप-निरीक्षक [Sub-Inspector], सहायक उप-निरीक्षक [Asst. Sub Inspector] व इतर समतुल्य श्रेणीचे अधिकारी) | (१) १५ दिवस किंवा त्यापेक्षा कमी - रु.२,०००/-<br>(२) १५ दिवसापेक्षा अधिक- रु.१,०००/- प्रती आठवडा या दरानुसार |
| ३ | **सी.ए.पी.एफ. च्या इतर श्रेणी** (हेड कॉन्स्टेबल [Head Constable], कॉन्स्टेबल [Constable] व समतुल्य श्रेणी) | (१) १५ दिवस किंवा त्यापेक्षा कमी - रु.१,५००/-<br>(२) १५ दिवसापेक्षा अधिक- रु.७५०/- प्रती आठवडा या दरानुसार |

(अ) केंद्रीय सशस्त्र पोलीस दल (सी.ए.पी.एफ.) (Central Armed Police Forces) यामध्ये भारत सरकारच्या गृह मंत्रालयाने तैनात केलेले सैन्यदल आणि त्यात केंद्रीय सशस्त्र पोलीस दल, रेल्वे संरक्षण दल, राज्य सशस्त्र पोलीस दल, भारतीय राखीव बटालियन इत्यादींचा समावेश आहे.

(आ) राज्यात निवडणूक कर्तव्यावर तैनात केलेल्या केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी/कर्मचारी यांना द्यावयाच्या मानधनाचे दर हे लोकसभा व विधानसभा सार्वत्रिक निवडणुका तसेच लोकसभा व राज्य विधानसभांच्या पोट-निवडणुकांसाठी लागू राहतील.

(इ) केंद्रीय सशस्त्र पोलीस दलाचे (सी.ए.पी.एफ.) अधिकारी/कर्मचारी यांना द्यावयाच्या मानधनाचे दर हे लोकसभा सार्वत्रिक निवडणूक-२०२४ पासून लागू होतील.

६. उपरोक्त बाबींवर होणारा खर्च प्रकरणपरत्वे "मागणी क्र. ए-०२, प्रधानशीर्ष २०१५-निवडणुका" अंतर्गत "उपशीर्ष १०५-संसदेच्या निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च" किंवा " १०६-राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ निवडणुका घेण्यासाठी लागणारा खर्च" किंवा "१०४-लोकसभा व राज्य संघराज्य क्षेत्र विधानसभा यांच्या एकास वेळेस घेतल्या जाणाऱ्या निवडणुकांचा खर्च" हया लेखाशीर्षाखालील मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

४. सदरचा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३५६/व्यय-४, दि.२४.०५.२०२४ अन्वये तसेच प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, महाराष्ट्र राज्य यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७१६१६१५२२०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्य पाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

YOGESH
MAHADEO GOSAVI

Digitally signed by YOGESH MAHADEO GOSAVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=409605c5c875f777d39cbf4ca29ce3d56c5c1d7c1ea54667614a049c47985d83, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D910025DFF598286A45B3B22318E6C113E071B7C6E85F3D06BECDD5995FC1966, cn=YOGESH MAHADEO GOSAVI
Date: 2024.07.16 16:26:58 +05'30'

**( योगेश गोसावी )**
**अवर सचिव व उप मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) / (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर
३. सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव
४. सर्व प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई
५. विभागीय आयुक्त (सर्व)
६. जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी (सर्व)
७. सर्व लोकसभा/विधानसभा मतदारसंघनिहाय निवडणूक निर्णय अधिकारी, (जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)
८. सर्व लोकसभा/विधानसभा मतदारसंघनिहाय सहायक निवडणूक निर्णय अधिकारी, (जिल्हाधिकारी व जिल्हा निवडणूक अधिकारी यांचेमार्फत)
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे
१०. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, वांद्रे, मुंबई
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. वित्त विभाग/कार्या.व्यय-४
१३. कक्ष अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग/का.२६, मंत्रालय, मुंबई
१४. कार्या.३३ (निवडणूक अर्थसंकल्प शाखा)
१५. निवड नस्ती